मराठवाडा व विदर्भ विभागातील १४ जिल्हयांसाठी प्रेरणा प्रकल्पांतर्गत जनजागृतीसाठी वाटप करण्यात आलेल्या बॅनर्सच्या खर्चास मंजुरी देण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१७ / प्रक्र-६८/ आरोग्य ३ (अ)

गो.ते.संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २२ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :-**

१) अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा, यांचे पत्र क्रमांक-संआसे /मा.आ./टे.३, Pre.Prak.IEC/ ३६९/१७,दि.१५.२.२०१७ चे पत्र.
२) अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा, यांचे पत्र क्रमांक-संआसे/मा.आ./टे.३, Pre.Prak.IEC/ १६९/१७,दि.२८.४.२०१७ चे पत्र.
३) अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा, यांचे पत्र क्रमांक-संआसे/मा.आ./टे.३,Pre.Prak.IEC/ ५१९/ १७, दि.३.६.२०१७ चे पत्र.

**वाचा:-** शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/ प्रक्र-३० / २०१३/ विनियम भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुसरुन प्रेरणा प्रकल्पांतर्गत जनजागृती करण्याकरिता मराठवाडा व विदर्भ विभागातील १४ जिल्हयांसाठी दि.२४.२.२०१६ ते दि.१८.३.२०१६ दरम्यान करण्यात आलेल्या फ्लेक्स बॅनरचे वाटपाच्या खर्चास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय:-**

प्रेरणा प्रकल्प जाहिरातीसाठी लावलेल्या फ्लेक्स बॅनरच्या खर्चास मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव उपरोक्त पत्रान्वये सादर करण्यात आला आहे. प्रेरणा प्रकल्पांतर्गत जनजागृती करण्याकरिता मराठवाडा व विदर्भ विभागातील १४ जिल्हयांसाठी दि.२४.२.२०१६ ते दि.१८.३.२०१६ दरम्यान फ्लेक्स बॅनरचे वाटप करण्यात आले होते. सदर बॅनर्ससाठी मे.अँगल ॲडव्हर्टायजिंग,शॉप नं.१२, एच विंग,डॉ.बी.ए.रोड,लालबाग राजा सोसायटी,लालबाग, मुंबई या संस्थेने दिलेल्या रु.६,३६,९००/- इतक्या रकमेचे देयकातून बॅनर उशीरा वितरण केल्यामुळे विलंब आकाराची रु.२२,०२७.८६ इतकी रक्कम वजा करुन उर्वरित रु.६,१४,८७२/- इतकी रक्कम सदर संस्थेस अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मुख्य लेखाशिर्ष २२१००२१७,२६-जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ या वर्षासाठी करण्यात आलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र-**२०१३/** प्र.क्र.**३०/** विनियम, दिनांक **१७.०४.२०१५** सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका **१९७८** भाग पहिला,उपविभाग एक मधील अनुक्रमांक **६** नियम **४०** (**१**) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२२१६३७३६४३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ROSHANI DINESH KADAM PATIL

Digitally signed by ROSHANI DINESH KADAM PATIL
DN: cn=ROSHANI DINESH KADAM PATIL, o, ou, email=roshani.patil@nic.in, c=US
Date: 2017.08.22 16:56:28 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन,मुंबई.
४. अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), आरोग्य भवन,मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
६. अवर सचिव सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प),मंत्रालय,मुंबई
७. सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य भवन, मुंबई
८. निवडनस्ती (आरोग्य-३अ).